अकोला विमानतळाच्या विस्तारीकरणासंदर्भात
अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : लवेसू २५१६/ प्र.क्र. २२६/ २८-अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १५ मार्च, २०१७.

<u>वाचा</u> :- १) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक अर्थसं- २०१६/ प्र.क्र. ८९/ अर्थ-३, दि. २० एप्रिल, २०१६.
२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक अर्थसं- २०१६/ प्र.क्र. ८९/ अर्थ-३, दि. ८ फेब्रुवारी, २०१७.
३) शासन निर्णय क्रमांक बीयुडी १६१३/ प्र.क्र.२३९/ २८-अ, दि. ४ मार्च, २०१४

**<u>प्रस्तावना</u> :-**

अकोला ( शिवणी ) विमानतळ विस्तारीकरण करण्याची कार्यवाही सुरु असून धावपट्टीचा लांबी १४०० मीटर वरुन १८०० पर्यंत वाढविण्यासाठी अंदाज ९४.७४ हेक्टर जमीन संपादित करुन भारतीय विमानपत्तन प्राधिकरण यांच्याकडे हस्तांतरीत करावयाची आहे. याअनुषंगाने डॉ. पंजाबराव देशमुख कृषी विद्यापिठाच्या अकोला , मौजे गुडधी येथील सर्व्हे नंबर २८,२९, ३०, ३१, ३२ मधील एकूण २०.७९ हेक्टर जमीन व मौजे शिवर येथील सर्व्हे नंबर ५,१०,११,१२,१३,२७,२९,३६,३८,३९ मधील एकूण ३९.८९ हेक्टर जमीन अशा एकूण ६०.६८हेक्टर जमिनीचा ताबा घेण्यात आला असून याकरीता जमिनीच्या किंमती योग्य रुपये ५,६४,३०,३५२/- इतकी रक्कम अ.क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये डॉ. पंजाबराव देशमुख कृषी विद्यापिठास देण्यात आली आहे. तसेच या जमिनीचा प्रत्यक्ष ताबा विमानपत्तन निदेशक, भारतीय विमानपत्तन प्राधिकरण यांना दिनांक ३०मे, २०१६ रोजी देण्यात आला आहे.

अकोला विमानतळाची भारतीय विमानपत्तन प्राधिकरण यांच्या ताब्यातील २२ हेक्टर व डॉ. पंजाबराव देशमुख कृषी विद्यापिठाकडून हस्तांतरीत केलेली ६०.६८ हेक्टर अशी एकूण ८२.६८ हेक्टर जमीन भारतीय विमानपत्तन प्राधिकरण यांच्या ताब्यात असून या व्यतिरिक्त आवश्यक सुमारे ३४.०६ हे. खाजगी जमिनीचे भूसंपादन जिल्हाधिकारी, अकोला यांच्यामार्फत करण्यात येणार आहे.

उपरोक्त विषयाच्या अनुषंगाने सन २०१६ च्या नागपूर येथील हिवाळी अधिवेशनामध्ये श्री. गोपीकिशन बाजोरिया, विधानपरिषद सदस्य यांनी महाराष्ट्र विधानपरिषद नियम १०१ अनुसार अकोला (शिवणी ) विमानतळ विस्तारीकरण संदर्भात लक्षवेधी सूचना क्रमांक ३३८ उपस्थित केली होती. सदर लक्षवेधी सूचनेवरील दिनांक ९ डिसेंबर, २०१६ रोजी विधानपरिषद सभागृहातील चर्चेच्या वेळी मा. राज्यमंत्री महोदयांनी अकोला ( शिवणी ) विमानतळाच्या धावपट्टीचे विस्तारीकरणाबाबत बैठक आयोजित करुन या संदर्भातील कामे तात्काळ सुरु करण्यात येतील असे आश्वासन दिले होते. त्याअनुषंगाने मा. राज्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १६ डिसेंबर, २०१६ रोजी बैठकीमध्ये अकोला (शिवणी ) विमानतळ विस्तारीकरणासाठी लागणाऱ्या खाजगी जमिनीच्या भूसंपादनाच्या मोजणीकरीता लागणारा आवश्यक निधी रु. २५.०० लाख एवढा निधी जिल्हाधिकारी , अकोला यांना उपलब्ध करुन देण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. मा. राज्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील बैठकीच्या कार्यवृत्तास मा. मुख्यमंत्री यांनी मान्यता दिली आहे. त्यानुसार अकोला विमानतळ विस्तारीकरणासाठी आवश्यक ३४.०६ हेक्टर खाजगी जमिनीचे भू-संपादन करण्याच्या अनुषंगाने जमीनमोजणीसाठी आवश्यक रु. २५.०० लाख निधी जिल्हाधिकारी, अकोला यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अकोला ( शिवणी ) विमानतळाच्या विस्तारीकरणासाठी आवश्यक असलेल्या सुमारे ३४.०६ हेक्टर खाजगी जमिनीचे भू-संपादन करण्याच्या अनुषंगाने जमीनीची मोजणी करण्यासाठी येणारा खर्च भागविण्यासाठी रु. २५.०० लाख जिल्हाधिकारी, अकोला यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पात विमानतळ व धावपट्यांचा विकास या (३०५३०१४६) (००) (०१) साठी रु. १०.०० कोटी तरतूद उपलब्ध करुन देण्यात आली आहे. त्यामधून सदर निधी वितरीत करण्यात येत असून खालील लेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा आणि त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक ए-७, ३०५३- नागरी विमानचालन
(०२) विमानतळे, १०२ छोटी विमानतळे - राज्य योजनांतर्गत योजना
(००) ( ०१) विमानतळ व धावट्टयांचा विकास ( ३०५३०१४६ )
३१- सहाय्यक अनुदान ( वेतनेतर ) ५०- इतर खर्च

३. याप्रित्यर्थ जिल्हाधिकारी, अकोला यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तसेच "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी खाजगी जमिनीच्या भूसंपादनाच्या अनुषंगाने मोजणीची कार्यवाही तात्काळ सुरु करावी व याबाबत झालेल्या खर्चाचा अहवाल तसेच खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र या विभागास व महालेखापाल यांना सादर करावे.

४. सदर शासन निर्णय संदर्भ क्रमांक १ व २ येथील वित्त विभागाच्या अनुक्रमे दिनांक २० एप्रिल, २०१६ व दिनांक ८ फेब्रुवारी, २०१७ च्या शासन परिपत्रकानुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०३१५१६०१५४०९०७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dilip P. Deshmukh

Digitally signed by Dilip P. Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=89b94ecffd8918a2710a5d1d74df9831b69f2b6f91aaf28f5f7e4afef961baa1, cn=Dilip P. Deshmukh
Date: 2017.03.15 16:04:00 +05'30'

**( दि. प्र. देशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव , मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. अप्पर मुख्य सचिव ( वित्त ) मंत्रालय, मुंबई
४. अप्पर मुख्य सचिव (नियोजन ) , मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव ( विमानचालन ) मंत्रालय, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
८. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) (लेखापरीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. उपसचिव, वित्त विभाग ( व्यय ४ ) मंत्रालय मुंबई ,
१०. उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग ( कार्यासन २५ ), मंत्रालय, मुंबई
१०. निवडनस्ती.